**अंगणवाडी प्रशिक्षण केंद्रावर देखरेख व नियंत्रण करण्यासाठी प्रत्येक जिल्हास्तरीय प्रशिक्षण केंद्रामध्ये समन्वय समिती नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१४/प्र.क्र.२३३/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रा◌ालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात महिला व बाल विकास विभागाअंतर्गत २ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र व ३३ अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्र आहेत. मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्रामध्ये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत मुख्यसेविका संवर्गास पायाभूत व उजळणी या प्रकारचे प्रशिक्षण देण्यात येते. तसेच अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्रात अंगणवाडी सेविका / मदतनीस यांना पायाभूत व उजळणी प्रशिक्षण देण्यात येते. सदर सर्व प्रशिक्षण केंद्राकरीता कर्मचारी आकृतीबंध व इतर बाबी, प्रशिक्षण सत्र, इतर बाबी अनुदान अदा करणेबाबत केंद्र शासनाने निकष ठरवून दिलेले आहेत. महाराष्ट्र राज्य बाल कल्याण समिती संचलित अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्र, नाशिक रोड, के.जे.मेहता हायस्कूलजवळ, ता.पळसे, जि.नाशिक या संस्थेमध्ये आर्थिक अनियमितता झाल्याचे निदर्शनास आले. त्यामुळे या सर्व प्रशिक्षण केंद्रावर देखरेख व नियंत्रण करण्यासाठी प्रत्येक जिल्हास्तरीय प्रशिक्षण केंद्रामध्ये समन्वय समिती नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्तप्रमाणे अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्रामध्ये आर्थिक अनियमितता झाल्याचे निदर्शनास आल्यामुळे राज्यातील २ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र व ३३ अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्रावर देखरेख व नियंत्रण करण्यासाठी प्रत्येक जिल्हयामध्ये (जिल्हास्तर) खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

१) विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास) - अध्यक्ष

२) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (संबंधित जिल्हयाचे) - सदस्य

३) उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बा.क.), जिल्हा परिषद (संबंधित जिल्हयाचे) - सदस्य सचिव

४) संबंधित अंगणवाडी प्रशिक्षण केंद्राचा प्रतिनिधी - सदस्य

सदर समितीची ३ महिन्यातून एकदा बैठक घेण्यात यावी. सदर बैठकीचे आयोजन करण्याची जबाबदारी सदस्य सचिव यांची राहील. सदर बैठकीमध्ये संबंधित जिल्हयातील अंगणवाडी प्रशिक्षण केंद्राच्या प्रशासकीय कारभाराचा तसेच आर्थिक बाबींचा आढावा घेण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१२१३४२४५१७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: CN = Dilip Babasaheb Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Women & Child Development
Reason: I am the author of this document
Date: 2014.08.26 13:02:58 +05'30'

**(दि. बा. पाटील)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. मा. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. प्राचार्य, मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र (सर्व)
८. प्राचार्य, अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्र (सर्व)
९. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०.सर्व विभागीय आयुक्त
११.सर्व जिल्हाधिकारी
१२.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३.सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
१४.सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास
१५.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१६.सर्व मुख्य अधिकारी, नगरपालिका,
१७.सर्व मंत्रालयीन विभाग
१८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
१९. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
२०. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२४. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२५. निवड नस्ती (कार्यासन ६)